**विमानचालन संचालनालयाच्या प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी व विमानचालन विभागाशी संबंधित विमानतळांवरील कामांना प्रशासकीय मान्यता तथा सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यासाठी शक्ती प्रदत्त समिती**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र:- संकीर्ण-१५१७/प्र.क्र.३१३/२८-अ**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,मंत्रालय,**
**मुंबई-४०००३२.**
**दिनांक- २८ मार्च, २०२२**

**संदर्भ:- १.शासन निर्णय क्र.-विचासं १११४/प्र.क.४७/२८-अ, दिनांक ६/१०/२०१५**
**२.शासन निर्णय क्र.- संकीर्ण-१५१७/प्र.क्र.३१३/२८-अ, दिनांक १५.०२.२०१८**

**प्रस्तावना:-**

विमानचालन संचालनालय, मुंबई कडून सादर करण्यात येणाऱ्या प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समितीची स्थापना करण्यात आली आहे.

२. देशात व राज्यात विमानचालन क्षेत्रात उद्योजकता व दळणवळण वाढविण्यासाठी नवीन धोरणे येत आहेत. शासनाने 'उडान' (Regional Connectivity Scheme RCS) योजनेसाठी राज्यातील नऊ विमानतळे RCS विमानतळे म्हणून अधिसूचित केली असुन त्या विमानतळांवर कमी अधिक प्रमाणात भुसंपादनासह विकासाची कामे करण्यात येत आहेत. अमरावती, गोंदिया, नाशिक, जळगाव, नांदेड, सोलापूर, कोल्हापूर, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या व्यतिरिक्त महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी कडून नागपूर येथील विमानतळ (मिहान), शिर्डी, पुणे इत्यादी विमानतळांचा विकास करण्यात येत आहे. या सर्व विमानतळांवर होवू घातलेल्या विकास कामांना प्रशासकीय मान्यता देण्यासाठी उच्चस्तरीय सचिव समिती संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नेमण्यात आली आहे. शक्ती प्रदत्त समिती वर "अपर मुख्य सचिव (सेवा)" यांचे ऐवजी "प्रधान सचिव (ऊर्जा)" यांचा "सदस्य" म्हणून समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**३. शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन ) मध्ये विमानचालन संचालनालयाशी संबंधित प्रस्तावांसाठी मुख्यसचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समितीचे गठन करण्यात आलेले आहे. याच समितीचा विस्तार करण्यात येवून "अपर मुख्य सचिव (सेवा)" यांचे ऐवजी "प्रधान सचिव (ऊर्जा)" यांचा "सदस्य" म्हणून समावेश करुन खालील प्रमाणे शक्ती प्रदत्त समितीचे नव्याने गठन करण्यात येत आहे. या समितीला विमानचालन संचालनालय, मुंबई कडून सादर करण्यात येणाऱ्या प्रस्तावांसह विमानतळांवरील विकास कामांना प्रशासकीय मान्यता, सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आले आहेत.

४. **शक्ती प्रदत्त समिती**

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | अप्पर मुख्य सचिव, गृह | सदस्य |
| ३. | अप्पर मुख्य सचिव, वित्त | सदस्य |
| ४. | अप्पर मुख्य सचिव, नियोजन | सदस्य |
| ५. | अप्पर मुख्य सचिव,मा.मुख्यमंत्री कार्यालय | सदस्य |
| ६. | अप्पर मुख्य सचिव,उद्योग | सदस्य |
| ७. | प्रधान सचिव सार्वजनिक बांधकाम | सदस्य |
| ८. | प्रधान सचिव नगर विकास-१ | सदस्य |
| ९. | प्रधान सचिव ऊर्जा | सदस्य |
| १०. | प्रधान सचिव विमानचालन | सदस्य सचिव |
| ११. | संचालक विमानचालन | सदस्य |
| १२. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी | सदस्य |

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२८१६०८१०६१०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, serialNumber=495c75b4c173c81f308bd63a1b33a5da4ea131ed182d44ea1b502ab4662e9810, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2022.03.28 17:36:09 +05'30'

**(म.कि.वाव्हळ)**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत माहितीसाठी व कार्यवाहीसाठी:

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन , मंत्रालय,मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव , मा.मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय,मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव , साप्रवि (सेवा) विभाग, मंत्रालय,मुंबई
४. अप्पर मुख्य सचिव , गृह विभाग, मंत्रालय,मुंबई
५. अप्पर मुख्य सचिव , वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
६. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अप्पर मुख्य सचिव , उद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. प्रधान सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०.प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
११. प्रधान सचिव, (नवि-१),नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२ प्रधान सचिव, ऊर्जा विभाग,मंत्रालय, मुंबई.
१३.विभागीय कार्यकारी संचालक, भारतीय विमानपत्तन प्राधिकरण(पश्चिम क्षेत्र),मुंबई.
१४.उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई.
१५.संचालक, विमानचालन संचालयालय, मुंबई
१६. निवड नस्ती.